**जिल्हा परिषदांमधील कर्मचा-यांच्या**
**प्रतिनियुक्तीबाबत**

महाराष्ट्र शासन
शासन परिपत्रक क्रमांक :- प्रतिनि-२०११ / प्र.क्र. १०९ /आस्था-९
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ८ एप्रिल, २०११.

वाचा :- शासन निर्णय क्रमांक - प्रतिनि-२००६/प्र.क्र.३९०/आस्था-९,
दिनांक २७ जून, २००६.

परिपत्रक :-

जिल्हा परिषदांमध्ये शिक्षकांच्या रिक्त पदांच्या संख्येत वाढ झाल्याने व शिक्षक नसलेल्या शाळांच्या ग्रामस्थांनी शाळा बंद सारखी आंदोलने सुरु केल्यानंतर विद्यार्थ्यांचे नुकसान होऊ नये म्हणून अल्प पटसंख्या असलेल्या बहुशिक्षकी शाळांमधून शिक्षकाची तात्पुरती व्यवस्था करुन शिक्षक नसलेल्या शाळांमध्ये शिक्षकांची व्यवस्था करण्यात येते, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. तथापि, ही व्यवस्था म्हणजे प्रतिनियुक्ती आहे याची नोंद घेऊन त्याबाबत विभागीय आयुक्त यांची मान्यता घेण्यात यावी. त्यास अनुसरुन शासनाचे असे आदेश आहेत की, अशा प्रकारे पूर्व मान्यता न घेणा-या संबंधितांविरुध्द विभागीय आयुक्त यांनी आपल्यास्तरावर आवश्यक ती कारवाई करावी. तसेच याचा नियतकालिक आढावा विभागीय स्तरावर घेण्यात यावा.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक - २०११०४०८२२५११९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

( प्रकाश हिर्लेकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१) विभागीय आयुक्त ( सर्व ) ,
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व )
प्रत :- १) जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (सर्व )
२) मा. मंत्री , ग्राम विकास यांचे खाजगी सचिव
३) मा. राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव
४)सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांचे स्वीय सहाय्यक

C:\lotus\work\wordpro\Pratiniyukti\2011/g.r. Pratiniukti-2011.lwp